क्रांतिज्योती सावित्रीबाई फुले बालसंगोपन योजनेच्या सुधारीत मार्गदर्शक सुचनांबाबत

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- बालसं-२०२२/ प्र.क्र.९२/का-८**
नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- ३० मे, २०२३

**वाचा :-**

१. समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग, शासन निर्णय क्र बीसीए १०७४/५७११६ एन, दिनांक २४ फेब्रुवारी १९७५
२. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.जेजेए-१०९४/प्र.क्र.४०/का-३, दिनांक १५ डिसेबंर १९९४
३. मा.संचालक, महिला व बाल विकास,पुणे यांच्या बालसंगोपन योजनेबाबत सुधारित नियम व मार्गदर्शक सुचना, दि १६ मार्च १९९५
४. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.बालसं-२००५/ प्र.क्र.९१/का-८, दि.११.११.२००५
५. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.बालसं-२०११/ प्र.क्र.३१३ /का-८, दिनांक ९ ऑक्टो २०१३
६. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.रिटपी-२०१८/ प्र.क्र.२१० /का-८, दिनांक ६ एप्रिल २०२१
७. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, अनाथ-२०२१/प्र.क्र.४९/का-०३, दि.१७.६.२०२१

**प्रस्तावना :-**

बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम २०१५ सुधारित अधिनियम २०२१ कलम २ (१४) व महाराष्ट्र राज्याचे बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण ) नियम, २०१८ नुसार अनाथ, निराश्रित, निराधार, बेघर, संरक्षण व निवा-याची गरज असलेल्या ० ते १८ वयोगटातील मुलां-मुलींना संस्थेत दाखल करण्याऐवजी पर्यायी कुटूंब उपलब्ध करुन देणे व संस्थेतील वातावरणाऐवजी कौटुंबिक वातावरणात त्यांचे संगोपन व विकास घडवून आणणे हा या योजनेचा मुख्य उद्देश आहे. सदर योजना ही संस्थाबाहय योजना असून या योजनेअंतर्गत ० ते १८ वयोगटातील मुलामुलींना थेट पर्यायी कुटूंबात संगोपनाकरिता ठेवता येते. अनाथ, निराधार, निराश्रित, बेघर, दुर्धर आजारी पालकांची मुले, कैद्यांची मुले या योजनेचा लाभ घेतात. प्रत्यक्ष

जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी कार्यालयातील अधिकारी अथवा स्वयंसेवी संस्थेचे सामाजिक कार्यकर्ते हे गृहचौकशी करुन संबंधित बाल कल्याण समितीस अहवाल सादर करतात. त्या अहवालाच्या आधारे बाल कल्याण समितीकडून दाखल आदेश घेवून लाभार्थ्यांस जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचे मार्फत बालसंगोपन या योजनेचा लाभ देण्यात येतो. सदयस्थितीत राज्यामध्ये कोविड -१९ इ. कारणांमुळे पालक मृत पावल्याने अनाथ झालेल्या बालसंगोपन योजनेच्या लाभार्थ्यांची संख्या वाढत आहे.

त्यामुळे एकाच कुटुंबातील दोन पेक्षा जास्त बालकांना लाभ देण्याबाबत, दोन पेक्षा जास्त बालके एकाच कुटूंबात संगोपनासाठी देण्याबाबत तसेच कार्यरत स्वयंसेवी लाभार्थी संख्या वाढ, नविन संस्थाना मान्यता व संस्था निवडीचे निकष, अनुदान वितरण पद्धती निश्चित करून याबाबत यापूर्वीचे सर्व शासन निर्णय / परिपत्रक अधिक्रमित करून सुधारीत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

**<u>सदर शासन निर्णयान्वये बालसंगोपन योजनेचे नाव बदलून क्रांतिज्योती सावित्रीबाई फुले बालसंगोपन योजना असे करण्यात येत आहे.</u>**

२. राज्यामध्ये क्रांतिज्योतीसावित्रीबाई फुले बाल संगोपन योजनेची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी बाल संगोपन योजनेच्या मार्गदर्शक सूचनांबाबतचे वाचा क्र. १ ते ५ वरील शासन निर्णय/ आदेश अधिक्रमित करून पुढीलप्रमाणे क्रांतिज्योतीसावित्रीबाई फुले बालसंगोपन योजनेच्या सुधारित मार्गदर्शक सूचनांना या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**१) <u>बालसंगोपन योजनेसाठी पात्र लाभार्थी:-</u>**

१. अनाथ किंवा ज्यांच्या पालकांचा पत्ता लागत नाही व जी बालके दत्तक देणे शक्य नाही अशी बालके.

२. एक पालक असलेली बालके, (एका पालकाचा मृत्यू, घटस्फोट, पालक विभक्तीकरण, परित्याग, अविवाहित मातृत्व, गंभीर आजार, पालक रूग्णालयात असणे, इ.कारणांमुळे कुटुंब विघटीत झालेली, एक पालक असलेली बालके).

३. कुटुंबातील तणाव /तंटे /वादविवाद /न्यायालयीन वाद अशा सारख्या कौटुंबिक संकटात बाधित बालके (Family Crisis).

४. कुष्ठरुग्ण पालकांची बालके, जन्मठेपेची शिक्षा भोगत असलेल्या कैद्यांची बालके, तुरुंगात असलेल्या पालकांची बालके, एच.आय.व्ही.ग्रस्त पालकांची बालके, कॅन्सर सारख्या दुर्धर आजाराने बाधित पालकांची बालके.

५. तीव्र मतीमंद बालके, एच.आय.व्ही.ग्रस्त किंवा कॅन्सरग्रस्त बालके, ४०% पेक्षा अधिक अपंगत्व असलेली, अंध, दिव्यांग बालके, भिक्षा मागणारी बालके, पोक्सो अधिनियमांतर्गत बळी पडलेली बालके, तीव्र कुपोषित बालके, सॅमबालके, दुर्धर

आजार असलेली बालके, व्यसनाधिन बालके, विविध प्रकारच्या दंगलीनी प्रभावित झालेली बालके, कोविड सारख्या रोगाच्या प्रादुर्भावाने दोन्ही / एक पालक गमावलेली बालके,नैसर्गिक आपत्तीमध्ये दोन्ही /एक पालक गमावलेली बालके, बालविवाहाला बळी पडू शकणारी बालके, विधी संघर्षग्रस्त बालके.

६. दोन्ही पालक दिव्यांग असलेली बालके.

७. रस्त्यावर राहणारी, शाळेत न जाणारी, बालकामगार बालके.

८. कौटुंबिक हिंसाचार प्रकरणात गुंतलेल्या पालकांची बालके.

९. "भिक्षेकरी गृहात" दाखल पालकांची बालके.(याबाबत भिक्षेकरी गृहाच्या अधिक्षक यांचे प्रमाणपत्र आवश्यक राहील.)

२) **बालसंगोपन योजने अंतर्गत मिळणारा लाभः-**

शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. बालसं-२०२१/प्र.क्र.७६/का-८, दिनांक १७/०२/२०२३ अन्वये बालसंगोपन योजने अंतर्गत प्रती बालक दरमहा देण्यात येणा-या परिपोषण अनुदानात अनुक्रमे रू.११००/- वरून रू.२२५०/-व स्वयंसेवी संस्थेच्या सहायक अनुदानात रू.१२५/- वरून रू २५०/- अशी वाढ करण्यात आली आहे. या योजनेअंतर्गत प्राप्त होणाऱ्या अनुदानातून बालकांना अन्न, वस्त्र, निवारा, शिक्षण, वैद्यकीय सुविधा इ. सुविधा संबंधित कुटुंबांमार्फत पुरविण्यात याव्यात. तसेच स्वयंसेवी संस्थेने सहाय्यक अनुदान रकमेमधून दोन सामाजिक कार्यकर्ता व एक डेटा एंट्री ऑपरेटर यांचे मानधन, प्रत्येक बालकाची केस फाईल, त्यांचे संबंधित अभिलेख, दस्तऐवज इ. हाताळणी व संग्रहीत करण्याचा खर्च, देखरेख, गृहभेटी करीताचा प्रवासखर्च यासह सर्व प्रकारचा प्रशासकीय खर्च भागवावा. या योजनेच्या अनुदानामध्ये शासनामार्फत वेळोवेळी करण्यात येणाऱ्या अनुदान वाढीनुसार अनुदान देय असेल.

३) **बाल संगोपन योजनेअंतर्गत मिळणाऱ्या लाभाचा कालावधीः-**

१. अनाथ, स्वत: किंवा दोन्ही पालक दिव्यांग असलेली बालके, स्वत: किंवा पालक एच.आय.व्ही./किंवा कॅन्सरग्रस्त असलेली बालके, कुष्ठरोगग्रस्त पालकाची बालके, तीव्र मतीमंद बालके, अशा बालकांना वयाची १८ वर्ष पूर्ण होईपर्यंत बाल संगोपन योजनेचा लाभ मिळेल.

२. कौटुंबिक कलहात सापडलेल्या बालकांना कौटुंबिक कलह संपुष्टात आल्याबाबतच्या न्यायालयीन आदेश निर्गमित झाल्यापासून सहा महिन्यापर्यंत किंवा वयाची १८ वर्षे पूर्ण होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत लाभ देय राहील.याकरिता सामाजिक तपासणी अहवालाच्या आधारे बाल कल्याण समितीने निर्णय घ्यावा.

३. जन्मठेपेची शिक्षा किंवा अन्य शिक्षा भोगत असलेल्या तुरूंगातील पालकांच्या बालकांना पालकांची शिक्षा संपल्यापासून ६ महिन्यापर्यंत किंवा बालकाच्या वयाची १८ वर्षे पूर्ण

होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत लाभ देय राहील. याकरिता सामाजिक तपासणी अहवालाच्या आधारे बाल कल्याण समितीने निर्णय घ्यावा.

४. भिक्षेकरी गृहात दाखल असलेल्या पालकांच्या बालकांना पालक भिक्षेकरी गृहातून मुक्त झालेल्या तारखेपासून सहा महिन्यापर्यंत किंवा बालकाच्या वयाची १८ वर्षे पूर्ण होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत लाभ देय राहील.

५. कौटुंबिक हिंसाचार प्रकरणात गुंतलेल्या पालकाच्या बालकांना प्रकरण निकाली झाल्याबाबत न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून त्या तारखेपासून ६ महिन्यापर्यंत किंवा बालकाची वयाची १८ वर्षे पूर्ण होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत लाभ देय राहील.

६. एका पालकाचा मृत्यू, घटस्फोट पालक विभक्तीकरण, परित्याग, अविवाहित मातृत्व, गंभीर आजार, पालक रुग्णालयात असणे इ. कारणांमुळे कुंटुंब विघटीत झाल्याने एक पालक असलेल्या बालकांना लाभ दिल्यानंतर त्याच्या पालकाने पुनर्विवाह केल्यास पुनर्विवाहाच्या तारखेपर्यंत किंवा बालकाच्या वयाची १८ वर्ष पूर्ण होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत लाभ देय राहील. सदर प्रकरणी पालकांनी पुनर्विवाह केल्याचे योग्य पुरावे स्वयंसेवी संस्थेचे सामाजिक कार्यकर्ते अथवा जिल्हा बाल संरक्षण कक्षा मधील सामाजिक कार्यकर्ता हे गृहभेट करून सामाजिक तपासणी अहवालासह बाल कल्याण समितीस सादर करतील.

७. बालसंगोपन योजनेच्या लाभार्थ्यांना लाभ देण्यासाठीचा कालावधी निश्चित करताना बाल कल्याण समितीने स्वयंसेवी संस्थेचे सामजिक कार्यकर्ता किंवा जिल्हा बाल संरक्षण कक्षातील सामाजिक कार्यकर्ता यांनी प्रत्यक्ष गृहभेट देऊन तयार केलेला सामाजिक तपासणी अहवाल विचारात घ्यावा. त्यानंतर बाल कल्याण समिती समोर प्रकरण परत्वे बालकास हजर करून अंतिम निर्णय घ्यावा.

### ४) <u>बालसंगोपन योजनेच्या लाभार्थी निवडीसाठी आवश्यक असणारी कागदपत्रे व कार्यपद्धती :-</u>

१. बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम २०१५ सुधारित अधिनियम २०२१ कलम २ (१४) व महाराष्ट्र राज्याचे बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण ) नियम, २०१८ नुसार अनाथ, निराश्रित, निराधार, बेघर, संरक्षण व निवा-याची गरज असलेल्या ० ते १८ वयोगटातील बालके या योजनेच्या लाभासाठी पात्र असतील.

२. लाभार्थ्याचा रहिवाशी दाखला (तलाठी / ग्रामसेवक / नगरसेवक / सरपंच यांचेकडून निर्गमित दाखला)

३. लाभार्थ्याचे व पालकाचे आधार कार्ड (छायांकींत प्रत)

४. लाभार्थ्याचे / पालकांचे वार्षिक उत्पन्न हे अडीच लाखापेक्षा कमी असल्याबाबतचा तलाठी / तहसीलदार यांचा दाखला

५. दारिद्रय रेषेखालील कुटुबांस प्राधान्य देण्यात यावे.

६. आई /वडिलांचा अथवा दोघांच्या मृत्यू दाखला.

७. पालक/आई/वडील यांचे समवेत घरासमोरचा फोटो.
८. बालकांचा जन्म तारखेचा दाखला / शाळा सोडल्याचा दाखला मिळण्यास विलंब होत असल्यास मागच्या इयत्तेची गुणपत्रक किंवा बोनाफाइड प्रमाणपत्र घेण्यात यावे.
९. बालक व पालक बाल कल्याण समितीसमोर हजर राहणे आवश्यक आहे.
१०.३ ते १८ वयोगटातील लाभार्थी हा शिक्षण घेत असल्यास (शाळेची गुणपत्रिका/बोनाफाईड सोबत जोडावे.)
११.बँक अकाऊंट क्रमांक (पासबुकची छायांकित प्रत)
१२.बालकाचा सांभाळ करत असल्याबाबतचे जैविक पालकांव्यतिरीक्त संगोपन कर्त्याचे किंवा नातेवाईकांचे हमीपत्र
१३.कुमारी मातेचे पाल्य, कौटुंबिक हिंसाग्रस्त महिलेचे पाल्य, आई किंवा वडील सोडून गेलेली बालके, दुर्धर आजाराने ग्रस्त पालकांची बालके, दोन्ही पालक अपंग असलेली बालके यांचे करिता प्रकरणपरत्वे पोलीस अहवाल, वैद्यकीय प्रमाणपत्र व ग्रामसेवक यांचा दाखला,
१४.बालकांचा सांभाळ करणारी व्यक्ती व्यसनाधिन नसल्याबाबतचा बालकाचा सांभाळ करणाऱ्या व्यक्तीचा सामाजिक तपासणी अहवाल.
१५."भिक्षेकरी गृहात" दाखल पालकांच्या बालकांकरीता (भिक्षेकरी गृहाच्या अधिक्षक यांचे प्रमाणपत्र आवश्यक राहील.)
१६.एका पालकाचा मृत्यू, घटस्फोट, पालक विभक्तीकरण, परित्याग, अविवाहित मातृत्व, गंभीर आजार या संदर्भातील आवश्यक कागदपत्रे असणे गरजेचे आहे.
१७.सर्वसामान्यपणे एका कुटुंबातील दोन बालकांना योजनेचा लाभ अनुज्ञेय राहील. तसेच एका कुटुंबात दोनच बालकांना सांभाळ करण्यासाठी ठेवता येईल.

**५) <u>बालसंगोपन योजनेच्या लाभार्थ्यांच्या निवडीसाठी राबवावयाची प्रक्रिया :-</u>**

१. स्वयंसेवी संस्थेतील सामजिक कार्यकर्ता, महिला व बाल विकास विभागाने प्राधिकृत केलेला अधिकारी / कर्मचारी व जिल्हा बाल संरक्षण कक्ष हे बालसंगोपन योजनेचा लाभ घेण्यास पात्र असणाऱ्या बालकांचा संपूर्ण सर्वेक्षण करून पात्र ठरु शकणाऱ्या बालकांची यादी तयार करतील.
२. ज्या कुटुंबातील दोन्ही पालकांचा कोविड-१९ या रोगाच्या प्रादुर्भावामुळे, नैसर्गिक आपत्तीमुळे / कृत्रिम आपत्तीमुळे झाला असेल अशा कुटुंबात दोनपेक्षा अधिक मुले असली तरी त्या सर्व बालकांना या योजनेचा लाभ अनुज्ञेय राहिल.
३. कोविड-१९ किंवा इतर आजारामुळे पालक मृत पावले असतील तर मृत्यू दाखला मिळण्यास उशीर होत असल्यास मयत पास / वैद्यकीय अधिकाऱ्याने दिलेले प्रमाणपत्र ग्राह्य धरण्यात यावे.

४. अंगणवाडी सेविका, स्वयंसेवी संस्था, जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी कार्यालय, बाल विकास प्रकल्प अधिकारी कार्यालय (नागरी,ग्रामीण आदिवासी) किंवा जिल्हा कार्यक्रम अधिकारी, जिल्हा परिषद या ठिकाणी योजनेचा लाभ मिळण्यासाठी अर्ज करणे आवश्यक आहे.

५. सादर केलेला अर्ज परीपूर्ण असणे आवश्यक आहे.

६. स्वयंसेवी संस्था व जिल्हा बाल संरक्षण कक्ष यांनी अर्जाची छानननी करून परीपूर्ण अर्ज जिल्हा महिला बाल विकास अधिकारी कार्यालयात सादर करावा.

७. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी सूचित करून दिलेल्या स्वयंसेवी संस्था त्यांच्या कार्यक्षेत्रातील अर्ज जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचेकडे सादर करतील. तसेच इतर कार्यक्षेत्रातील लाभार्थ्यांचे अर्ज अंगणवाडी सेविका मार्फत जिल्हा बाल संरक्षण कक्ष, वन स्टॉप क्रायसिस सेंटर),चाईल्ड लाईन, एकात्मिक बाल विकास प्रकल्प कार्यालय, तालुका स्तरीय संरक्षण अधिकारी (कनिष्ठ) यांचेमार्फत जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी कार्यालय यांच्या कार्यालयात प्रस्ताव पाठवतील.

८. ग्राम बाल संरक्षण समिती,तालुका बाल संरक्षण समिती व वॉर्ड बाल संरक्षण समिती या ठिकाणी त्यांच्या पातळीवर बालकांचे अर्ज घेऊन प्रत्यक्ष अथवा अंगणवाडी सेविकेमार्फत संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी तसेच जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या कार्यालयात सादर करता येतील.

९. जिल्हा महिला बाल विकास अधिकारी कार्यालय येथे बालसंगोपन लाभासाठी अर्ज प्राप्त झाल्यानंतर गृहभेट व सामजिक तपासणी अहवालाकरिता आदेश मिळण्यासाठी जिल्हा महिला बाल विकास अधिकारी यांनी ०८ दिवसाच्या आत बाल कल्याण समितीकडे प्रस्ताव पाठवावा.

१०.प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर ०८ दिवसाच्या आत बाल कल्याण समिती सामाजिक तपासणी अहवालाकरिता गृहभेटीचा आदेश पारित करावा.

११.बाल कल्याण समितीने गृहभेट आदेश पारित केल्यानंतर ०८ दिवसाच्या आत स्वयंसेवी संस्था व जिल्हा बाल संरक्षण कक्षातील सामाजिक कार्यकर्ता हे अंगणवाडी सेविका, अंगणवाडी मुख्यसेविका/पर्यवेक्षिका, वन स्टॉप क्रायसीस सेंटर, अभय केंद्र, MSW विद्यार्थी, शासकीय संस्थांचे /स्वयंसेवी संस्थांचे परिवीक्षा अधिकारी, समुपदेशक,चाईल्ड लाईनचे सामाजिक कार्यकर्ता यांच्या सहकार्याने चौकशी करून सामाजिक तपासणी अहवाल बाल कल्याण समितीकडे सादर करावा.

१२.बालकल्याण समितीने लाभार्थ्यांचे परिपूर्ण प्रस्ताव गृहभेट व सामाजिक तपासणी अहवालाची छाननी करून बालक व त्याच्या पालकांना ८ दिवसाच्या आत उपस्थित राहण्याचे आदेश देवून, बालकास काळजी व संरक्षणाची गरज असल्याची खातरजमा

करुन योजनेचा लाभ मंजुर करण्याबाबत अभिप्राय देऊन प्रस्ताव अंतिम मंजुरी करीता जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचेकडे पाठवावा.

१३.जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी बालसंगोपन योजनेच्या लाभाचा मंजुरी आदेश ४ प्रतीत द्यावा. प्रत्येकी एक प्रत बाल कल्याण समिती, जिल्हा महिला बाल विकास अधिकारी कार्यालय, बालसंगोपन लाभार्थी व स्वयंसेवी संस्था यांना द्यावी.

१४.अर्ज करतेवेळी बालकास वयाची १८ वर्ष पूर्ण होण्यास कमीत कमी ६ महिन्याचा कालावधी शिल्लक असणे आवश्यक आहे. अन्यथा अर्ज स्वीकारले जाणार नाहीत.

१५. योजनेच्या लाभाचा मंजूरी आदेश महिन्याच्या १५ तारखेस किंवा त्यापुर्वी निर्गमित झाला असेल तर त्या लाभार्थ्यास महिन्याच्या ०१ तारीखे पासून लाभ देण्यात येईल तर महिन्याच्या १५ तारखेनंतर मंजूरी आदेश निर्गमित झालेले असल्यास मिळाल्यास पुढील महिन्याच्या ०१ तारखेपासून लाभ देय राहील.

१६.बालसंगोपन योजनेचा लाभ देण्याबाबत आदेश निर्गमित झाल्यानंतर संबधीत स्वयंसेवी संस्थेचे सामाजिक कार्यकर्ता यांनी बालकांना तीन महिन्यातून किमान एकदा गृहभेट देऊन त्यांच्या कौटुंबिक, शारीरिक, मानसिक व शैक्षणिक प्रगती बाबत एकत्रित अहवाल तयार करून जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांना सादर करावा.

१७.लाभ चालू झाल्यानंतर तीन महिन्यानंतर लाभ मिळालेल्या लाभार्थीना पुन्हा गृह्भेट करून लाभार्थीच्या कुटुंबाचे आर्थिक सक्षमीकरण करणे करिता स्वयंसेवी संस्था जिल्हा बाल संरक्षण कक्षातील सामाजिक कार्यकर्ता, मिशन वात्सल्य अंतर्गत वेगवेगळ्या योजनांची माहिती देऊन आवश्यक योजनांचा प्रत्यक्ष लाभ देण्याकरिता प्रयत्न करतील.

१८. बाल कल्याण समितीने बाल संगोपन योजनेमध्ये आदेशित केलेल्या बालकांचे प्रत्येक वर्षी जुन महिन्यामध्ये शैक्षणिक प्रगती आणि बोनाफाईडच्या आधारे आवश्यकतेनुसार लाभास मुदतवाढ देण्याचे आदेश निर्गमीत करण्यात यावेत.

६) <u>**बालसंगोपन योजनेकरिता स्वयंसेवी संस्थाची निवडीचे निकष व कार्यपद्धती:-**</u>

१. आयुक्त, महिला व बाल विकास विभाग, महाराष्ट्र राज्य पुणे यांनी प्रत्येक जिल्ह्यातून बाल संगोपन योजना राबविण्याकरिता स्वयंसेवी संस्थांचे अर्ज हे जाहिरात प्रसिद्ध करून मागवावे.

२. प्रत्येक जिल्ह्यातून सबंधित जिल्ह्यात कार्यरत असलेल्या स्वयंसेवी संस्थांनी सदर जाहिरातीनुसार विहित नमुन्यात चार प्रतीं मध्ये अर्ज **"परिशिष्ट ब"** मध्ये नमूद आवश्यक कागदपत्रे जोडून संबधित जिल्ह्याच्या जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी कार्यालयात जमा करतील.

३. त्यानंतर संबंधित जिल्ह्याचे जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी स्वयंसेवी संस्थेच्या कार्यालयात भेट देऊन तपासणी करावी व संस्थेच्या मागील तीन वर्षाच्या

कार्याबाबत सखोल तपासणी करुन संस्थेला मंजूर करावयाची लाभार्थी संख्या व कार्यक्षेत्राबाबत शिफारस करावी.

४. संस्था भेटीनंतर संबंधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी संस्थांचे मूळ अर्ज, हमीपत्रासह स्वतःचा तपासणी अहवाल व संस्थेस मान्यता देण्याबाबत लाभार्थी संख्या व कार्यक्षेत्राबाबत स्वयंस्पष्ट अभिप्रायासह तीन प्रतींतील प्रस्ताव विभागीय उपायुक्त यांचेमार्फत आयुक्त महिला व बाल विकास विभाग, महाराष्ट्र राज्य पुणे यांचेकडे सादर करावा.

५. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचेकडून प्राप्त प्रस्तावांची छाननी करून आयुक्त, महिला व बाल विकास विभाग, महाराष्ट्र राज्य पुणे यांनी सोबतच्या परिशिष्ट -ब" प्रमाणे संस्थेच्या कार्यक्षेत्र व मंजूर करावयाची लाभार्थी संख्या याबाबत स्वयंस्पष्ट शिफारस करून मंजूर करावयाच्या संस्थाची जिल्हा निहाय यादी शासनाकडे मंजूरीस्तव सादर करतील.

६. आयुक्त, महिला व बाल विकास यांचेकडून प्रस्ताव सादर झाल्यावर शासनाकडून जिल्हा व कार्यक्षेत्र निहाय संस्था व लाभार्थी संख्येस मान्यता प्रदान करण्यात येईल.

७. मान्यता प्रदान आदेशानंतर संस्था प्रत्यक्षात जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या सहकार्याने जिल्ह्यात प्रत्यक्षात बाल संगोपन योजनेचे काम सुरु करील.

८. बालसंगोपन योजना राबविणाऱ्या संस्थेला देण्यात येणारी मान्यता आदेशाच्या दिनांकापासुन पाच वर्षासाठी राहील. तदनंतर मान्यतेचे नुतनीकरण करण्यासाठी उपरोक्तप्रमाणे प्रक्रीया अवलंबण्यात येईल.

९. स्वयंसेवी संस्थेस २०० पेक्षा जास्त मुलांसाठी मान्यता देण्यात येणार नाही.

**७) <u>स्वयंसेवी संस्थेची जबाबदारी व कार्य:-</u>**

१. पात्र बालकांचे प्रस्ताव मान्यतेकरीता जिल्हा महिला बाल विकास अधिकारी कार्यालयामार्फत बाल कल्याण समिती कडे सादर करणे.

२. पालक कुटुंबाचा शोध घेणे. संगोपनकर्त्या कुटुंबास मार्गदर्शन करणे.

३. लाभार्थी बालकाच्या प्रगती बाबत लाभार्थी /संगोपनकर्त्या कुटुंबाची नियमित देखरेख ठेवणे.

४. किमान तीन महिन्यातून एकदा गृहभेटी देऊन लाभार्थ्यांचा सामाजिक तपासणी अहवाल जिल्हा महिला व बाल अधिकारी यांचे मार्फत बाल कल्याण समितीकडे सादर करणे.

५. प्रत्येक बालकाचा प्रस्तावा सोबतचे सर्व अभिलेख संगणकीकृत करून जतन करून ठेवणे. जिल्हा महिला बाल विकास अधिकारी अथवा शासनाने मागणी केल्यास सदर अभिलेख उपलब्ध करून देणे.

६. दोन सामजिक कार्यकर्ता व एक डाटा एन्ट्री ऑपरेटर यांना दरमहा किमान वेतन कायद्याप्रमाणे मानधन नियमितपणे अदा करणे, मानधन अदायगी न झाल्यास संस्थेने दिलेल्या बँक हमीतून सदर कर्मचारी यांना जिल्हा महिला बाल विकास अधिकारी हे मानधन अदा करू शकतील.

७. मिशन वात्सल्य योजनेतील तालुकास्तरीय समित्यातील कृती दलातील विविध विभागाच्या सहकार्यातून विविध योजनांचा लाभ संगोपन कर्त्या कुटुंब व बालकास मिळवून देऊन त्यांना आर्थिक दृष्ट्या सक्षम करणेसाठी लवकरात लवकर प्रयत्न करणे.

<u>८) संस्थेचे अनुदान मूल्यनिर्धारण व मूल्यनिर्धारण अंतिमीकरण पध्दती :-</u>

१. मागील वर्षाचे अनुदान मूल्यनिर्धारण तसेच संस्थेचे कामकाजाचे मुल्यांकन जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी करतील.

२. संस्था त्यांचे मागील वर्षाचा अनुदान मुल्यनिर्धारणसाठीचा प्रस्ताव पुढील वर्षाच्या ३१ ऑगस्ट पूर्वी जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांना सादर करतील.

<u>९) अनुदान प्रस्तावासोबत पुढील कागदपत्रे सादर करणे अनिवार्य असेल:-</u>

१. संस्थेचा अर्ज
२. मागील वर्षाचे अनुदान वितरण आदेश
३. लाभ दिलेल्या बालकांची यादी
४. बालकांचे त्रैमासिक गृहभेटीचे अहवाल (प्रत्येक तिमाहीचा एक असे एकुण ४ अहवाल)
५. बालकांचे शैक्षणिक गुणवत्ता प्रमाणपत्र
६. बालकांस योजनेचा लाभ मंजूर केल्याबाबतचे आदेश
७. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी बालकांना अनुदानासाठी पात्र केल्याबाबतचे आदेश
८. सनदी लेखापालाचा अहवाल
९. संस्थेचा मागील वर्षाचा कामाचा अहवाल

<u>१०) अनुदान वितरीत करण्यासाठी सादर प्रस्तावाच्या अनुषंगाने करावयाची कार्यवाही:-</u>

१. उपरोक्त २ प्रमाणे प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी संबधीत संस्थेचे अनुदान मुल्यनिर्धारण १५ ऑक्टोबर पूर्वी पुर्ण करावे. त्यासाठी **"परिशिष्ट इ"** नुसार तीन महिन्यातुन किमान एकदा संस्थेची तपासणी करुन व मुल्यनिर्धारण अंतिमीकरणासाठी प्रस्ताव संबधित विभागीय उपआयुक्त,महिला व बाल विकास यांना सादर करावा.

२. मूल्यनिर्धारण अथवा त्याचे अंतिमीकरण करताना मागील वर्षात संस्थेने त्यांचेकडील किती बालकांच्या कुटुंबांचे सक्षमीकरण केले आहे हे देखील विचारात घेण्यात यावे.

३. विभागीय उप आयुक्त यांनी ३० नोव्हेबर पूर्वी अनुदान मुल्यनिर्धारणाचे अंतिमीकरण करावे व अंतिमीकरणाचे आदेश (वसुली/ देय रकमासह) निर्गमित करावे व विभागातील एकत्रित माहिती आयुक्त,महिला व बाल विकास यांना सादर करावी.

४. विभागीय उपआयुक्त व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी संस्थेचे मुल्यनिर्धारण व अंतिमीकरण प्रक्रिया राबविताना लाभार्थ्यांना योजनेचा लाभ झाल्याबाबत सामाजिक अंकेक्षण (Social Audit) अहवाल सादर करणे आवश्यक राहील.

**११) अनुदान वितरण पध्दती:-**

१. दर वर्षाच्या ३० एप्रिल पूर्वी जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी त्यांच्या जिल्हयासाठी आवश्यक असलेल्या तरतुदीची संस्थानिहाय व लाभार्थी निहाय मागणी आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांचेकडे करावी व मागणीची एक प्रत विभागीय उपआयुक्त,महिला व बाल विकास यांना अग्रेषित करावी.

२. आयुक्त, महिला व बाल विकास यांनी जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचेकडून प्राप्त प्रस्ताव तपासून लाभार्थी निहाय व संस्थांनिहाय निधी वितरण प्रस्ताव शासनास सादर करावा.

३. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार DBT प्रणालीद्वारे लाभार्थ्यांच्या खात्यात व संस्थेच्या खात्यात लाभ वितरीत करण्यात येईल.

२. सदर सुधारीत मार्गदर्शक सुचना दि.१ एप्रिल, २०२३ पासून राज्यात लागू असतील सदर योजनेची मार्गदर्शक सुचनेनुसार अंमलबजावणी करण्याची जबाबदारी आयुक्त, महिला व बाल विकास यांची राहील. त्यांनी वरिल मार्गदर्शक सुचना व बाल न्याय अधिनियमांतर्गत असलेल्या तरतूदी सर्व अधिनस्त कार्यालये व संबधित संस्थांच्या निदर्शनास आणून देवून राज्यात **क्रांतिज्योती सावित्रीबाई फुले बालसंगोपन योजनेची** प्रभावी अंमलबजावणी करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०५३०१६३५१२५५३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NILESH JANARDAN PATIL

Digitally signed by NILESH JANARDAN PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b7f57a5d2af23fdb37cfec3c30cfe085ddbef06ea381e7e81401a472bbb966f7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7D8429F943427129A6A081EE223FEAC961CDD926C4D3542C55A470F22A7C7AE, cn=NILESH JANARDAN PATIL
Date: 2023.05.30 17:03:04 +05'30'

(डॉ.निलेश ज. पाटील)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,

३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई,
४. मा.सभापती/उपसभापती विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई,
५. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ,मुंबई,
६. मा.मंत्री (म. व बा. वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव, मंत्रालय,मुंबई,
८. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई,
९. प्रधान सचिव ( व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.प्रधान सचिव (ले. व को.), वित्त विभाग,मंत्रालय ,मुंबई,
११.आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१२.महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर,
१३.सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास
१४.सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,
१५.सर्व बाल कल्याण समिती अध्यक्ष व सदस्य,
१६. सर्व बाल न्याय मंडळ अध्यक्ष व सदस्य,
१७.सर्व कार्यासने महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८. निवड नस्ती/का-८.

## परिशिष्ट- अ

## बालसंगोपन योजने अंतर्गत लाभ मिळण्याकरिता लाभार्थी बालकाची माहिती नमुना प्रपत्र

| | | |
|---|---|---|
| १ | जिल्हयाचे नाव | |
| २ | संस्थेचे नाव/जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | |
| ३ | बालकाचे नाव | |
| ४ | जन्मतारीख | |
| ६ | लिंग | |
| ७ | जात व धर्म | |
| ८ | शिक्षण | |
| ९ | संगोपनकर्त्याचे नाव | |
| १० | कायमस्वरूपी व सध्याचा पत्ता व संपर्क क्रमांक | |
| ११ | बालकांचा पालकासोबत घरासमोरचा फोटो | |
| १२ | बालक व पालक यांचा आधार क्रमांक UID | |
| १३ | राष्ट्रीयकृत बँकेचे खाते क्रमांक, IFSC, MICR No (बालक व पालक यांचे संयुक्त बँक खाते) | |
| १४ | बालकांची वर्गवारी (अनाथ, निराश्रित, बेघर, दुर्धर आजारी पालकांची मुले, कैद्यांची मुले, कोविड १९ मुले एक पालक व द्विपालक गमावलेली मुले, पालकांचा शोध न लागलेली मुले, कृष्ठरोग पालकाची बालके इ. कौटुंबिक कलहातील / भिक्षेकरी गृहातील पालकांची मुले इ.) | |
| १५ | या व्यतिरिक्त अन्य योजनेचा लाभ घेत असल्यास त्याची माहिती | |
| १६ | बालकल्याण समितीचा अभिप्राय | |
| १७ | बाल कल्याण समिती मंजुरी आदेश क्र. व दिनांक व कालावधी | |
| १८ | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचा मंजूरी आदेश, क्रमांक व दिनांक | |

## परिशिष्ट-ब

## बालसंगोपन योजने अंतर्गत मान्यता मिळण्याकरिता स्वयंसेवी संस्थांनी यांनी प्रस्तावासोबत जोडावयाची कागदपत्रे सुची

| अ.क्र | तपशील | |
|---|---|---|
| १. | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, यांचा प्रस्तावाधीन संस्था भेट निरीक्षण, तपासणी अहवाल. | |
| २. | संस्थेचा विहित नमुन्यातील अर्ज आहे / नाही? | |
| ३. | संस्था नोंदणी अधिनियम १८६० अन्वये संस्थेचे नोदणी प्रमाणपत्र. | |
| ४. | मुंबई सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम १९५० अन्वये नोंदणी प्रमाणपत्र. | |
| ५. | संस्थेच्या निती पोर्टलवरील नोंदणी क्रमांक व घटना व नियमावली | |
| ६. | संस्थेच्या घटनेमधील ध्येय उद्देशात महिला व बाल विकासाच्या क्षेत्रात कार्य करण्याचा उल्लेख आहे किंवा कसे ? | |
| ७. | कार्यकारी मंडळात एकाच कुटूंबातील दोन पेक्षा अधिक व्यक्ती नसल्याबाबतचे संस्थेच्या पदाधिकाऱ्याचे हमीपत्र | |
| ८. | कार्यकारी मंडळातील पदाधिकारी / सदस्य शासकीय सेवेत नसल्याचे व एकमेकांचे नातेवाईक नसल्याचे जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचे प्रमाणपत्र. | |
| ९. | संस्थेच्या कार्यकारी मंडळाची प्रत्येकाच्या स्वाक्षरीत यादी व चारित्र्य पडताळणी प्रमाणपत्र | |
| १०. | योजना सुरु करणेबाबत संस्थेच्या कार्यकारी मंडळाचा ठराव | |
| ११. | योजनेस मान्यतेनंतर अनुदान स्वीकारुन खर्च करु शकणाऱ्या पदाधिकाऱ्याच्या नावाचा संस्थेचा ठराव त्यांचे नाव, पदनाम, हुद्दा, | |
| १२. | संस्थेचे सद्यस्थितीतील बँक बॅलन्स सर्टिफिकेट (प्रमाणपत्र) , तसेच पासबुकाची छायाकिंत प्रत जोडणे आवश्यक | |

| | | |
|---|---|---|
| १३. | संस्था व्यावसायिक कार्य करत नसल्याबाबतचे हमीपत्र. | |
| १४. | कर्मचारी यादीत किमान दोन कर्मचारी एम.एस्.डब्ल्यू. शैक्षणिक पात्रता धारण केलेले असावेत.कर्मचारी माहिती -नाव, वय, शिक्षण, अनुभव याबाबतचे पुरावे. | |
| १५. | सनदी लेखापालाने प्रमाणित केलेला मागील तीन वर्षाचा लेखा परीक्षण अहवाल | |
| १६. | संस्थेच्या कार्याचा मागील तीन वर्षाचा सविस्तर अहवाल जोडणे, संस्थेला कुटूंब व बाल कल्याण क्षेत्रातील कार्याचा ३ वर्षाचा अनुभव असल्याचा पुरावा | |
| १७. | लाभार्थी यादी जोडणे आवश्यक, सदरचे लाभार्थी अन्य योजनांचा लाभ घेणारे नसावेत | |
| १८. | योजना राबविण्यासाठी स्वतंत्र जागा असावी. संस्थेच्या जागेबाबत तपशिल, करारनामा जोडणे आवश्यक | |

(वरील सूचीनुसार प्रस्ताव ०४ प्रतीत संस्थेने जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी कार्यालयाकडे सादर करावा. सर्व हमीपत्र संस्थेच्या लेटर हेडवर मुद्रित असावीत. तसेच प्रस्तावातील प्रत्येक पृष्ठावर सलग क्रमांक नोंदवावेत. प्रत्येक पृष्ठावर संस्थेचा शिक्का असावा. वरील सुचीनुसार परिपूर्ण प्रस्तावच पात्र समजले जातील.असेच प्रस्ताव जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी कार्यालय पुढील कार्यवाहीसाठी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचेकडे सादर करतील.)

## परिशिष्ठ क

## बाल संगोपन योजनेअंतर्गत संस्थेच्या नोंदणीप्रमाणपत्रासाठी अर्जाचा नमूना

अर्जदार संस्थेचे नाव
पत्ता
दिनांक

प्रति,
आयुक्त,
महिला व बाल विकास, पुणे
मार्फत,
जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, --------------

बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम २०१५ सुधारित अधिनियम २०२१ कलम २ (१४) व महाराष्ट्र राज्याचे बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) नियम, २०१८ नुसार अनाथ, निराश्रित, निराधार, बेघर, संरक्षण व निवा-याची गरज असलेल्या ० ते १८ वयोगटातील बालकांना बालसंगोपन योजनेच्या लाभ देण्याकरिता नविन संस्था / वाढीव लाभार्थी -संख्येकरिता संस्था निवडीच्या निकषानुसार प्रस्ताव सादर करण्यात येत आहे.

१) संस्था नोंदणी अधिनियम १८६० अन्वये संस्थेचे नोंदणी प्रमाणपत्र.
२) मुंबई सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम १९५० अन्वये नोंदणी प्रमाणपत्र.
३) संस्थेची नीति आयोग पोर्टलवर नोंदणी प्रमाणपत्र.
४) संस्थेची घटना व नियमावली
५) संस्थेच्या कार्यकारी मंडळातील पदाधिकारी सदस्य शासकीय सेवेत नसल्याचे व एकमेकांचे नातेवाईक नसल्याचे हमीपत्र.
६) संस्थेचा योजना सुरु करणेबाबत कार्यकारी ठराव.
७) योजनेस मान्यतेनंतर अनुदान स्विकारून खर्च करू शकणाऱ्या पदाधिकाऱ्याच्या नावांचा संस्थेचा ठराव त्याचे नाव, पदनाम व स्वाक्षरीसह.
८) संस्थेचे सद्यस्थितीतील किमान रु. १० लाखाची वार्षिक उलाढाल असल्याबाबत सनदी लेखापाल यांचे प्रमाणपत्र सोबत बँक पासबुकची छायांकित प्रत.
९) संस्थेच्या कार्याचा मागील तीन वर्षाचा सविस्तर अहवाल.
१०) योजना राबविण्यासाठी संस्थेच्या कार्यालयाबाबत तपशिल, इमारत मालकी बाबत कागदपत्रे/ भाडे करारनामा.
११) सर्व हमीपत्र.

२. तरी सदर प्रस्तावास मान्यता मिळावी हि विनंती.

आपला विश्वासू
(स्वाक्षरी व शिक्का)
संस्था अध्यक्ष/सचिव

# परिशिष्ट -ड

## बालसंगोपन योजनेअंतर्गत नविन संस्था मान्यतासाठी शासनाकडे करावयाचा अर्जाचा नमुना

| | | |
|---|---|---|
| १. | मान्यता मागणा-या संस्थेचे नाव त्यांचा कार्यालयाचा पत्ता,दुरध्वनी क्रमांक | |
| २. | संस्थेच्या स्थापनेची तारीख | |
| ३. | संस्थेचे सचिव/ अध्यक्ष यांचे नाव व पत्ता व दूरध्वनी क्रमांक | |
| ४. | संस्था नोंदणी अधिनियम,१८६० अन्वये संस्थेचे नोंदणी प्रमाणपत्र घेतले आहे का | |
| ५. | मुंबई सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम १९५० अन्वये नोंदणी प्रमाणपत्र घेतले आहे का | |
| ६. | संस्थेच्या ध्येय आणि उददेश थोडक्यात | |
| ७. | संस्थेच्या घटनेमधील ध्येय उददेशात महिला व बाल् विकासाच्या क्षेत्रात कार्य करणाऱ्या / राबविणाऱ्या योजनांचा उल्लेख असणे आवश्यक | |
| ८. | संस्थेच्या कार्यकारी मंडळाची यादी जोडणे आवश्यक | |
| ९. | संस्थेचा योजना सुरू करणेबाबत कार्यकारी मंडळाचा ठराव | |
| १०. | संस्थेच्या कार्यकारीय मंडळाची प्रत्येकाच्या स्वाक्षसरीत यादी व चारित्रय प्रमाणपत्र जोडणे आवश्य्क आहे. | |
| ११. | संस्थेचे सद्यस्थितील बॅक बॅलन्स् सर्टफिकिट (प्रमाणपत्र), तसेच पासबुक छायांकिंत प्रत जोडणे आवश्यक | |
| १२. | संस्था व्यवसायीक कार्यकरत नसल्याबाबतचे हमीपत्र | |
| १३. | कर्मचारी यादीत किमान दोन कर्मचारी एम.एस.डब्ल्यू. शौक्षिणक पात्रता धारणकेलेले असावेत | |
| १४. | सनदी लेखापालाने प्रमाणीत केलेला मागील तीन वर्षाचा लेखापरिक्षण अहवाल जोडणे | |
| १५. | संस्थेच्या कार्याचा मागिल तीन वर्षाचा सविस्तर अहवाल जोडणे, संस्थेला कुटुंब व बाल कल्याण क्षेत्रातील कार्याचा तीन वर्षाचा अनुभव असणे आवश्यक | |

| | | |
|---|---|---|
| १६. | लाभार्थी यादी जोडणे आवश्यक, बालसंगोपन योजनेच्या निकशानुसार पडताळणी केलेले असावे सदरचे लाभार्थी अन्य योजनेचा लाभ घेणारे नसावेत | |
| १७. | योजना राबविण्यासाठी स्वतंत्र जागा असावी | |
| १८. | संस्था कुटुंब सक्षमीकरणासाठी काही उपक्रम राबवित असेल तर ते नमूद करावे | |
| १९. | संस्था महिला व बाल विकास विभागाच्या कोणत्या योजना राबविते का राज्य/ केंद्र शासनाचे अनुदान घेते का याबाबत माहिती जोडणे आवश्यक | |

ठिकाण संस्थेचा शिक्का व स्वाक्षरी

दिनांक

# परिशिष्ट-इ

## बालसंगोपन योजनेचा संस्था तपासणी अहवाल

| | | |
|---|---|---|
| १ | संस्थेचे नांव व पत्ता | |
| २ | योजनेचे नांव | |
| ३ | दूरध्वनी क्र. | |
| ४ | भेट देणाऱ्या अधिकाऱ्यांचे नांव व पदनाम | |
| ५ | भेटीचा दिनांक व वेळ | |
| ६ | संस्था नोंदणी अधिनियम,१८६० अन्वये संस्थेचे नोंदणी प्रमाणपत्र | |
| ७ | मुंबई सार्वजनिक विश्वस्तव्यवस्था अधिनियम १९५० अन्वये नोंदणी प्रमाणपत्र | |
| ८ | संस्थेची घटना व नियमावली | |
| ९ | संस्थेच्या घटनेमधील ध्येय उददेशात महिला व बाल विकासाच्या क्षेत्रात कार्य करणाऱ्या राबविणाऱ्या योजनांचा उल्लेख असणे आवश्यक | |
| १० | संस्थेच्या कार्यकारी मंडळाची यादी जोडणे आवश्यक<br>कार्यकारी मंडळात एकाच कुटुबांतील दोन पेक्षा अधिक व्यक्ती नसाव्यात. | |
| ११ | कार्यकारी मंडळातील पदाधिकारी/सदस्य शासकीय सेवेत नसल्याचे व एकमेकांचे नातेवाईक नसल्याचे जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचे प्रमाणपत्र जोडणे आवश्यक | |
| १२ | संस्थेच्या कार्यकारी मंडळाची प्रत्येकाच्या स्वाक्षसरीत यादी व चारित्रय प्रमाणपत्र पाठविणे | |
| १३ | संस्थेचा योजना सुरूकरणेबाबत कार्यकारी मंडळाचा ठराव | |
| १४ | योजनेस मान्यतेनंतर अनुदान स्विकारून खर्च करू शकणा-या पदधिकारीचा ठराव त्यांचे नाव पदनाम हुददा स्वाक्षरीसह जोडणे आवश्यक | |
| १५ | संस्थेचे सद्यस्थितील बॅक बॅलन्स्<br>सटिफिकिट (प्रमाणपत्र), तसेच पासबुक छायांकित प्रत जोडणे आवश्यक | |
| १६ | संस्था व्यवसायीक कार्यकरत नसल्याबाबतचे हमीपत्र | |
| १७ | कर्मचारी यादीत किमान दोन कर्मचारी एम.एस.डब्ल्यू. शैक्षणीक पात्रता धारण केलेले असावेत | |
| १८ | सनदी लेखापालाने प्रमाणीत केलेला मागील तीन वर्षाचा लेखापरिक्षण अहवाल जोडणे | |
| १९ | संस्थेच्या कार्याचा मागिल तीन वर्षाचा सविस्त्र अहवाल जोडणे, संस्थेला कुटुंब व बाल कल्याण क्षेत्रातील कार्याचा तीन वर्षाचा अनुभव असणे आवश्यक | |
| २० | लाभार्थी यादी जोडणे आवश्यक, सदरचे लाभार्थी अन्य योजनेचा लाभ | |

| | | |
|---|---|---|
| | घेणारे नसावेत | |
| २१ | योजना राबविण्यासाठी स्वतंत्र जागा असावी संस्थेच्या जागेबाबत सविस्तर तपशील,<br>अ. इमारत संस्थेची आहे की, भाडेतत्वावर घेतली आहे.<br>ब. घरमालकाचे नाव<br>क. इमारतीचे क्षेत्रफळ<br>ड.इमारतीत विद्युत पाणी इत्यादी. सुविधा उपलब्ध आहेत.<br>इ. भाडेतत्वावर असेल तर करारनामा जोडणे आवश्यक | |
| २२ | संस्थेची आर्थिक स्थिती बॅक बॅलन्स्<br>प्रमाणपत्र जोडणे आवश्यक | |
| २३ | संस्थेअंतर्गत कार्यरत असलेले इतर उपक्रम | |
| २४ | संस्था कुटुंब सक्षमीकरणासाठी काही उपक्रम राबवित असेल तर ते नमूद करावे | |
| २५ | संस्था एक व्यक्ती अथवा विशिष्ठ समूहाच्या फायदयासाठी चालविण्यात येते काय | |
| २६ | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचे निरिक्षणे व स्वयंस्पष्ट अभिप्राय असणे आवश्य्क | |

**तपासणी अधिका-यांची स्वाक्षरी,नाव व पदनाम**

## परिशिष्ठ फ

## हमीपत्र -१

बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम २०१५ सुधारित अधिनियम २०२१ कलम २ (१४) व महाराष्ट्र राज्याचे बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण ) नियम, २०१८ नुसार अनाथ, निराश्रित, निराधार, बेघर, संरक्षण व निवा-याची गरज असलेल्या ० ते १८ वयोगटातील बालकांना बालसंगोपन योजनेच्या लाभ देण्याकरिता नविन संस्था / वाढीव लाभार्थी ---------- संख्येकरिता संस्था निवडीच्या निकषानुसार प्रस्ताव सादर करण्यात येत आहे.

तरी सदरच्या संस्थेमधील कार्यकारी मंडळातील पदाधिकारी / सदस्य शासकीय सेवेत नसल्याचे व एकमेकांचे नातेवाईक नसल्याबाबतचे हमीपत्र सादर करण्यात येत आहेत.

अध्यक्ष / सचिव
नाव-
पदनाम-
स्वाक्षरी-

## हमीपत्र -२

बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम २०१५ सुधारित अधिनियम २०२१ कलम २ (१४) व महाराष्ट्र राज्याचे बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण ) नियम, २०१८ नुसार अनाथ, निराश्रित, निराधार, बेघर, संरक्षण व निवा-याची गरज असलेल्या ० ते १८ वयोगटातील बालकांना बालसंगोपन योजनेच्या लाभ देण्याकरिता नविन संस्था / वाढीव लाभार्थी ---------- संख्येकरिता संस्था निवडीच्या निकषानुसार प्रस्ताव सादर करण्यात येत आहे.

तरी सदरची संस्था व्यावसायिक कार्य करत नसल्याबाबतचे हमीपत्र सादर करण्यात येत आहेत.

अध्यक्ष / सचिव
नाव-
पदनाम-
स्वाक्षरी-

## हमीपत्र - ३

मी -----------------------------------------------राहणार ----------------

------------- असुन मी ---------------------------------या बालकांचा नात्याने आई / वडील/नातेवाईक / संगोपण कर्ता असुन सदर बालकाचा सांभाळ करण्याकरिता तयार असल्याचे हमीपत्र सादर करण्यात येत आहे.

**आपला विश्वासू**

## हमीपत्र - ४

मी -----------------------------------------------राहणार --------------

--------------- असुन मी ---------------------------------या बालकांचा नात्याने आई / वडील /नातेवाईक / संगोपण कर्ता असुन सदर बालक इतर कोणत्याही योजनेचा लाभ घेत नसल्याचे हमीपत्र सादर करण्यात येत आहे.

**आपला विश्वासू**